मारुतीरायाच्या आग्रहा खातर विधिलीखीतांस सामोरे जाण्यासाठी मच्छिंद्रनाथ स्त्री राज्यात जाण्यासाठी राजी झाले. मारुती वचनमुक्त झाला आणि मच्छिंद्रनाथ वचनबद्ध झाले. स्त्री राज्यात मच्छिंद्र जाण्यासाठी तयार झाला या आनंदाने मारुती अदृश्य होऊन अज्ञातात गेले. मच्छिंद्र तीर्थाटन करून स्त्री राज्यात जाऊ या हेतूने हिंगळा देवीच्या मंदिराकडे निघाले, एका दुर्गम आणि निबिड अरण्यात हिंगळा देवीचे स्थान होते. उंचच उंच डेरेदार वृक्षांची विस्तीर्ण वनरांनी काटेरी जाळ्या, वेली यांसारख्या वनस्पतींनी घनदाट अरण्य दाटले. निबिडतेमुळे वायुलाही संचार करता येत नव्हता. डरकाळ्या फोडणारी हिंस्त्र श्वापदे मुक्तपणे संचार करीत आहेत अशा त्या अरण्यात सूर्याची किरणे धरणीपर्यंत पोहचत नसल्याने भर दुपारी ही अंधार जाणवत असे. सुर्योदायापासुनच सुर्यालाही शंका वाटायची की परवार्तीत होणारी माझी प्रकाशकिरणे हे घनदाट अरण्य गिळंकृत तर करणार नाही? पदोपदी मृत्युचे भय वाटावे इतके भयप्रद वातावरण आसमंतात स्थिरावले होते. अशा त्या निर्जन वनात हिंगळादेवीचे मंदिर होते.

मंदिराच्या भव्य प्रवेशद्वारावर अष्टभैरवांचा खडा पहारा होता, आंतल्या प्रांगणात शतकोटी चामुडां, शांखिनी, डंखिनी या स्त्री योद्धयांची जगती गस्त होती आणि आंतल्या गर्भगृहात माता भगवती, आदिशक्ती हिंगळादेवी ध्यानस्त बसली होती.

प्रवेश द्वारावरील अष्ठभैरवांनी महाद्वाराकडे येत असलेल्या मच्छिंद्रनाथांना ओळखले. याच गोसाव्याने मार्तंड पर्वतावरील नागअश्वत्थ वृक्षावर आपणासह सर्व देवदेवतांची वस्त्र प्राप्ती करून शाबरीमंत्र काव्य केले असल्याची स्मृती त्यांना आली. त्याच्या विद्येची परीक्षा पाहण्यासाठी हेतूपुरस्सर त्या अष्टभैरवांनी वेषांतर केले आणि साधूंची भूमिका वठवत कलह उकरून काढण्यासाठी ते आडवे आले. “योगी महाराज! कुठे चालला आहात? असे विचारात ते प्रवेश मना करू लागले. मच्छिंद्र उत्तरले, “आदिमाया शक्ती माता हिंगळादेवीच्या दर्शनासाठी जात आहे. आपण साधूसंन्यासी दिसत आहात येणार का माझ्याबरोबर ?

अष्ठभैरव म्हणाले, “ये जोगड्या, आम्ही इथलेच आहोत. देवीमंदीरांच्या द्वाराचे रक्षण करतो. तुझासारखे पाखंडी येथे आले की, मग त्यांच्या पापपुण्याच्या झाडा घेऊन, त्यांच्या श्रद्धेचा पडताळा घेऊनच त्यांनी देवीच्या दर्शनासाठी सोडतो. पापी लोकांना मंदिरात न सोडता हाकलून देतो. जर खोटे बोलून आंत जाण्याचा प्रयत्न केला तर द्वार लहान होऊन त्यात तो माणूस अडकतो. मग खोटे उघडकीस आल्यावर, आम्ही फसवणाऱ्यांना कठोर शासन करतो. आता खरं काय ते सांगून पाप पुण्याचा झाडा दे. वेळ फुकट घालवू नकोस.” अशी दमदाटी अष्ठभैरव करू लागले.

नाथ संयमाने म्हणाले, “द्वारपाल हो! मी पाप पुण्यातील भेद जाणत नाही. मी माझी बरीवाईट सर्वच कर्मे ईश्वरास अर्पण केली आहेत. जसे सावध राहून स्थितप्रज्ञता बाळगली तर हर्ष भय या भावना विलय पावतात, तसे योगरूपी स्थितप्रज्ञतेत मी पाप पुण्ये विलीन केली आहेत. नदीपात्रामधून नांव जात असताना किनाऱ्यावरील वृक्ष पळत असल्याचा भास होतो. पण किनाऱ्यावर उभा असणारा ज्ञानी सत्य जाणतो ते सत्य मी जाणले आहे. सूर्याचे प्रतिबिंब पाण्यात पडले तरी त्याचे तेज डोळ्यांना सहन होत नाही. तसे शाश्वत सत्य सर्वत्र प्रकाशमान असते, पाप पुण्य हा भेद तुमच्यासाठी असतो आम्ही तर त्याच्या उत्पात्तीपलीकडे पोहोचलो आहोत.” अष्टभैरव हा युक्तिवाद ऐकून संतप्त झाले.

अष्टभैरव रागवून म्हणाले, “अरे जोगड्या ! उगाच गुळगुळीत बोलून शब्दांचे खेळ करू नकोस. अरे, माणूस म्हणून जन्माला आल्यावर त्याच्या हातून काहीतरी कर्म अकर्म होत असतेच. ती जगरहाटीच आहे आणि तू काय नाही म्हणतोस! अशी थापाथापी करून तुला देवीचे दर्शन मिळेल काय? लवकर पापुण्याचा पाढा वाच, नाही तर आल्या पावली माघारी निघून जा. सत्यकथन केल्याशिवाय तुला मंदिरामध्ये प्रवेश नाही. जास्त शहाणपणा केलास तर नाहक बांका प्रसंग उद्धभवेल शिक्षा केली जाईल हे लक्षात ठेव.” नाथ उत्तर देतात, “साक्षात काळपुरुष यमसुद्धा मला शिक्षा करू शकणार नाही, तर मशाकासमान (मच्छर) क्षुद्र जीव माझ्याशी कसा सामना कराल?”

मच्छिंद्रनाथांच्या आत्मविश्वासपूर्वक आव्हानाने अष्टभैरव त्वेषाने चढाई करण्यासाठी सज्ज झाले. त्रिशूल, फरशी, धनुष्यबाण, तलवारी, मुद्गल, अंकुश, बरची, मांडू नामक लोखंडी शस्त्र. गदा, गुर्ज, दारुगोळे, भाले, गुप्ती, कुठार, अशा प्रकारची असंख्य घातक शस्त्रे, शस्त्रास्त्रे पारजत ते सामन्यासाठी सज्ज झाले. ते पाहून धीरोदात्तपणे नाथांनी भास्मझोळीतून चिमुटभर भस्म काढून गर्जना केली. “जय जय गुरुदेव दत्त!” मंत्रोच्चार करीत दहा दिशांना विभूती फवारली, सूर्य, वरूण, अश्विनी, अग्नी, वायू, वज्रनाथ, गण, गंधर्व, साधू संत, सिद्धयोगी या सर्वांचे, स्मरण करीत त्यांच्या सहकार्याची करूणा भाकली. वज्रपंजर मंत्र आणि पृथ्वीअस्त्र म्हणून कपाळाला भस्म लावताच देह वज्रासारखा कणखर झाला. आता या वज्रदेहावर कोणत्याही अमोघ शस्त्राचा किंचितही परिणाम होणार नव्हता. त्यानंतर मच्छिंद्रनाथ सरसावले, ते म्हणाले, “लाढवय्या वीर योद्धयांनो! या आता युद्ध करावयासाठी आळस कराल तर तुम्हाला जन्मदात्यांची शपथ आहे. तुमच्या गुरुजनांची शपथ आहे. सामना करायचा नसेल तर गुरूच्या नावास कलंक लावून तोंड काळे करून फिरणार आहात काय? असं पराजित होण्यापेक्षा कोरड्या विहिरीत जाऊन जीव द्यावा. हेच माझे तुम्हाला निर्वाणीचे सांगणे आहे.

मच्छिंद्रनाथांचे प्रतिआव्हान आणि जिव्हारी लागणारे बोल ऐकून अष्टभैरवांनी शस्त्रप्रहार करण्यास सुरवात केली. रणतुंबळ चकमक सुरू झाली. खणखणाट निनादू लागला. त्वेषाने शस्त्रांचे घाव घातले जाऊ लागले. क्रोधाग्नीचे हुंकार स्पष्ट होऊ लागले परंतु नवल असे की कोणत्याही घातक शस्त्रांची नाथांवर मात्र चालत नव्हती. कसल्याही प्रकारची इजा होत नव्हती अष्टभैरावांची शस्त्रे बोथट झाली हत्यारांची धार उलट फिरली. नाथांना शस्त्रांचे घाव तृणवत भासत होते.

शस्त्रे निष्प्रभ ठरत आहेत. हे पाहून अष्टभैरवांनी ‘अस्त्रविद्या’ बाहेर काढली, धनुष्यावर बाण चढवून बाणाग्रावर, वायुअस्त्र, कामास्त्र, वासवास्त्र, नागास्त्र, ब्रह्मास्त्र, रुद्रास्त्र, दानवास्त्र, कृतांतास्त्र अशी आठजणांनी आठ महाभयंकर अस्त्रे सोडली. त्यामुळे सोसाट्याचे वादळ सुटले, चित्त विचलित व्हावे म्हणून अप्सरांचे कामुक नृत्य सुरु झाले. विजांचा चमचमाट आणि कडकडाट सुरु झाला. भयंकर वादळासह मेघवृष्टी सुरु झाली. विषारी सर्प फुत्कार सोडू लागले, आणि असंख्य राक्षस उत्पन्न होऊन धावून आले, साक्षात काळाचा मृत्यु व्हावा असा रणसंग्राम सुरु झाला. भूकंपाचे धक्के बसू लागले. शेषनागही दचकून फणा उगारू लागला. कूर्म भयाने थरथर कापत दडून बसला. सुळ्यांवरील डळमळणारा पृथ्वीगोल नेटाने सावरताना वराह भयभीत झाला. सर्व सजीव प्राणरक्षणाच्या भयाने सैरावैरा पळत सुटले. सृष्टीचा विनाशकाळ आल्याची जाणीव निर्माण झाली. गंधर्वांना बेशुद्धी आली. सूर्यदेव आणि वरुणदेवही भयापोटी गुरुडपंखात आश्रय घेण्याचा प्रयत्न करू लागले. सदशिवाने भयाने गुहेत आश्रय घेतला. नागास्त्राच्या विषाने जीवसृष्टी

करपून जाऊ लागली. ब्रह्मास्त्र आणि रुद्रस्त्रांच्या परिणामाने चराचर जाळून भस्म होईल असे वाटले. त्यातच दानावस्त्र आणि काळास्त्रावर थैमान मांडले. सगळेच अघटीत घडत होते.

हिंगळादेवीच्या अष्टभैरवांनी मांडलेला हा विनाश पाहून मच्छिंद्रनाथानी एकवेळी नऊ अस्त्रशक्ती निर्माण करून प्रतिआक्रमण केले. त्यांच्या प्रत्येक अस्त्रावर प्रतिहल्ला करण्यासाठी सबळ अस्त्रे निर्माण केली. वासवास्त्राला पर्वतास्त्राने खंडीत केले. कामास्त्रापुढे विरकतास्त्र प्रकट करताच कामास्त्र निष्प्रभ झाले. वासवास्त्राला मोहनास्त्राने मोहून घेतले. नागास्त्रावर गरुडास्त्राने हल्ला करून भक्षण केले. ब्रह्मास्त्राची प्रार्थना करून त्याला वश केले. रुद्रस्त्रापुढे कार्तीकेयास्त्र सादर करताच कार्तीक बाळाला पाहताच पीत रुद्र शांत झाला. दानवास्त्राचा देवास्त्राने पाडाव केला. काळास्त्रावर संजीवनी अस्त्र सोडल्याने काळपाश निष्प्रभ झाला. अशा प्रकारे अष्टभैरवांच्या आठ अस्त्रांचा पाडाव झाला आणि नाथांचे नववे अस्त्र होते वाताकर्षण अस्त्र. ते तर सूर्यासारखे तेजस्वी आणि अजोड पराक्रमी होते. त्याच्या प्रभावामुळे श्वासोच्छवास बंध होऊन अष्टभैरव कासावीस होऊन मुर्च्छित पडले. मुखातून रक्तस्त्राव होऊ लागला. डोळे पांढरे करून हातपाय झाडू लागले. या चकमकी दरम्यान अष्टभैरवांनी जेव्हा वासवास्त्र सोडले तेव्हा विजांच्या कडकडाटाने आसमंत दणाणून गेला असता. हा प्रलयनाद कसला होत आहे ते पाहण्यासाठी हिंगळादेवी मातेने (मात्रुकागणंना) पाठविले होते. त्या सेविका म्हणजे रुपसुंदर लावण्यखणी जलदेवता होत्या चंडा, रंडा, मुंडा, कुंडा, मंडा, वंडा, वितंडा अशी किती नावे?? अनंत नावांची नांवे सांगता जिव्हा शुष्क होईल. सुरवातीला पाच सहाजणी जो समाचार पाहण्यासाठी आल्या होत्या. त्यांनी महाद्वारावरचा रणसंग्राम पाहून अंबामातेला सांगण्याऐवजी पळत जाऊन त्यांच्या मुख्य देवींना आणि कोटी चामुंडांना बोलवून आणला, त्या सर्वजणी महापराक्रमी वीरांगना होत्या. त्यांनी रंणागीणीसारखे रौद्ररूप धारण करून शस्त्र हल्ला चढविला. पण नांथानी कामबाणावर मोहनास्त्राची योजना करून त्यांना भुरळ पाडली. त्यामुळे त्यांच्या स्मृतीविभ्रम झाला. सर्वजणी वेडाचार करू लागला. कोणी वाद्ये वाजवीत नाचू लागल्या. कोणी टाळ्या वाजवीत ताल धरला कोणी साधूप्रमाणे दृष्टी स्थिर करून आकाशाकडे पाहू लागल्या. कोणी म्हणत आकाशयान आले. कोणी नाहक हसावयास लागल्या. कोणताही विनोद घडला नसतांनाही कोणी उगाच डोलू लागल्या. कुणी गळा काढून रडू लागल्या कुणी ताण छेडीत गायन करू लागल्या. कुणी रानोमाळ भटकू लागल्या कुणी मातीत लोळू लागल्या. कुणी माती उधळू लागल्या. कुणी 'अंबाबाईचा उदो उदो' असा जयघोष करू लागल्या कुणी तोंडात माशा जाईपर्यंत निपचित पडल्या आहेत. कुणी एकमेकांना शिव्या देत तंटा करीत आहेत. कुणी प्रेमाने गळाभेटी घेत आहेत. कुणी झाडांच्या खोडांना कवटाळत आहेत. कुणी दगडधोंडे मांडीवर घेऊन त्यांना स्तनपान करवीत आहेत. कुणी अंगावरील वस्त्रे उतरवून झाडांना नेसवीत आहेत. कुणी चोळी कडून त्याची लंगोटी नेसत आहेत. कोणी अंगाला भस्म चोळून हात वर करून 'अल्लख' म्हणून भिक्षा मागत आहेत. कुणी अलंकार उतरवून दगडास लेववीत आहेत. एक ना अनेक! नानाप्रकारे विसंगत कृतीचा अवलंब चालला होता.

मच्छिंद्रनाथांनी त्यांच्यावर वातास्त्र सोडून सोसाट्याचे वारा उत्पन्न केले. त्या सुसाट वाऱ्यांनी त्यांची नेसती वस्त्रे आकाशात उडवून नेली. सर्वजण वस्त्रहीन अवस्थेत, नग्न होऊन नृत्य करू लागल्या. नाथांनी मायास्त्र मंत्रून प्रत्येकी समोर एक एक देखणा पुरुष निर्माण केला. त्यानंतर मोहनास्त्र आवरून स्मरणास्त्र जपताच त्या सार्वजणी भानावर आल्या. आणि स्वतःकडे पाहतात तर काय? आपण केस मोकळे सोडून परपुरुषाबरोबर नग्न होउन नृत्य करीत आहेत. लज्जेने चूर चूर होऊन त्या सैरावैरा पळत अंबामातेकडे गेल्या. पळता पळता त्यांनी अष्टभैरवांची दयनिय अवस्था पाहिले होती.

भयभित आणि शरमिंदा झालेल्या त्या सर्वजणांनी नाग्नावस्थेत पाहून हिंगळादेवी मातेला आश्चर्य वाटले. माता विचारू लागली, "हे काय झाले? तुमची वस्त्रे कुठे आहेत? तुम्हाला कुणी नग्न केले?" त्या धापा टाकीत, आणि अंग लपविण्याचा प्रयत्न करीत सांगू लागल्या "माई गं! आमची पुण्याई संपली म्हणून आमची अशी अवस्था झाली, महादारवाज्यावर कुणी एक जोगी आला असून त्याने आपल्या अष्टभैरवांचे चे प्राण घेतले आणि आमची लज्जास्पद अवस्था केली. मातोश्री! तू सुद्धा तात्काळ हे स्थान सोडून पळ; नाही तर आमच्यासारखी दुर्दशा तुझीसुद्धा होईल. तो साधा सुधा योगी नसून, सूर्याने दुसरा 'यम' जसा काही जन्मास घातला आहे. खऱ्या खुऱ्या यमापेक्षाही हा जोगी महाभयानक आहे. जणू काही तो अकरा रुद्रांचा एक अवतार आहे. तो देव, दानव, नक्षत्र, चंद्र, सर्वांना ग्रासून टाकतील माते पळ! आपले प्राण वाचवं" असे म्हणून त्या थरथर कापू लागल्या. त्यांची वाचा मंदावली. "आला! आला!!" असे ओरडत त्या योग्याच्या दहशीतने दचकू लागल्या अंबेच्या मागे संरक्षणासाठी लपूछपू लागल्या.

त्यावर मायभवानी ध्यानस्थ होऊन योगचक्षुने तिला वास्तव दृष्टीस पडले. हा तर उपरिचर पुत्र, कवी नारायणचा अवतार मच्छिंद्रनाथ आहे. मग सर्वांना वस्त्रे नेसवून माता त्यांच्या सह बाहेर येऊन नाथांजवळ आली. तिन्ही जगाच्या जननीने त्याला ममतेने जवळ घेतले आणि आलींघन दिले. मच्छिंद्रनाथ तर तिच्या दर्शनासाठीच आले होते. तिच्या चरणावर त्यांनी स्वतःला झोकून दिले. मातोश्री म्हणाली, "वत्सा! फार मोठा पराक्रम केला आहेस! आता त्वरेने या अष्टभैरावांना उठाव, नाही तर ते गतप्राण होतील."

मातेची आज्ञा शिरसावंध मानून मच्छिंद्रांनी त्वरित वातप्रेरक अस्त्र सोडून भैरावांना सावध केले. त्यातही नाथांनी आपल्या अभ्यासाचा आणि श्रद्धेचा अविष्कार दाखविला. पाण्यातील फक्त दुधाचा अंश ज्या नजाकतीने राजहंस पक्षी स्वाहा करतो, किंवा पंचाक्षरी ज्या आत्मविश्वासाने मंत्रतंत्र सामुग्री काढतो, त्याच कुशलतेने नाथांनी वाताकर्षण अस्त्र काढून वातप्रेरक योजले. अष्टभैरव सावध होऊन अंबिका मातेसमोर येऊन नमन करून म्हणाले, "मच्छिंद्रनाथांनी महापराक्रम केला आहे मातोश्री! त्यांच्यावर आमचा कोणताही वैयक्तिक आकस किंवा राग नव्हता. पण मार्तंड पर्वतावरील अश्वत्थ वृक्षावर मिळवलेल्या विद्येची कसौटी घेण्यासाठी आम्हीच त्याला हे सारे करण्यासाठी प्रवृत्त केले आणि हा समरप्रसंग घडला आहे. आज आम्ही महापराक्रमी झुंजार वीर पहिला. हा सकलविद्या पारंगत झाला आहे.

अंबामाता म्हणाली, "पुत्र! मलाही तुझे सामर्थ्य दाखव ना." "माते काय लीला करून दाखवू, आज्ञा कर!" नाथांनी शब्द दिला. "हा पर्वत आकाशात उडवून पुन्हा जशाचा तसा जागच्याजागी ठेव." देवींनी इच्छा प्रकट केली.

अवश्य माते! असे म्हणत नाथांनी चिमुटभर भास्मावर नागास्त्र आणि वायुअस्त्र यांचा प्रयोग करून दोन्ही अस्त्रांचा समन्वय घडविला. त्याचा परिणाम विस्मयकारकच म्हणायला हवा नागास्त्रने पर्वताला वेटोळे घालून त्यावरील सर्व दगड, माती, वनस्पती, इत्यादी धरून ठेवले आणि वायुदेवतेने पर्वत उंच उडवून रथाप्रामाणे आकाशात घिरट्या घालून परत त्याच ठिकाणी स्थिर केला. त्यातही केवळ नाथांचे सामार्थ्याची चाचपणी करण्याच्या हेतूने अंबामातेने पर्वत ढासळविण्यासाठी गुप्त प्रयत्न केला. परंतु त्याचा उपयोग झाला नाही.

देवी, नाथांचे सामर्थ्य मान्य करतांना म्हणाली, "मच्छिंद्रनाथा! तू धन्य आहेस. विभिन्न आणि परस्पर विरोधी शक्तींना वैरभाव विसरून एकत्रितपणे वापरण्याची तुझी सब अलौकिकच आहे. वाघ शेली, माग गरुड यांच्या उपजतवृत्ती

प्रमाणेच अचल पर्वत आणि निमिबार्धही अचल अशा वायूवर प्रेमाने एकत्र नांदावयास लावण्याची किमया तुझ्यासारखा योग्यातच असते.”

मच्छिंद्रनाथानी तो पर्वत पुन्हा जागच्या जागी जैसे थे ठेवला. हिंगळामाता संतुष्ट झाली. त्याला तीन दिवस पाहुणचारानिम्मित ठेवले. निरोप देतांनाही अंबामातेने प्रसन्न होऊन स्पर्शास्त्र आणि विभाक्तास्त्र अशी दोन अस्त्रे वरदान रुपात दिली. हिंगळा मातेचे वरदान मिळवून मच्छिंद्रनाथ बारा मल्हारांच्या दर्शनसाठी निघाले.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने कपटबंधनातून आपली मुक्तता होईल आणि शत्रूंचा पराभव होईल.